**राज्यातील कृषी विद्यापीठे व त्यांच्याशी संलग्नित अनुदानित महाविद्यालयातील अधिकारी/कर्मचारी यांना परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेंतर्गत कर्मचाऱ्यांच्याकडून वसूल करण्यात आलेल्या अंशदानाच्या रकमेइतकीच समतुल्य अंशदानाची रक्कम आहरित करण्यासाठी वापरावयाच्या लेखाशिर्ष संकेतांकाबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण १५१४/प्र.क्र.११७/६-ए**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : २८/१२/२०१६

<u>संदर्भ :</u>- १) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक:अंनियो १००७/प्र.क्र.१८/सेवा-४, दिनांक ७/७/२००७
२) शा. नि. कृषी व पदुम विभाग, क्रमांक:कृविआ १११०/प्र.क्र.१००/६-ए, दिनांक २७/०२/०९
३) शासन परि., वित्त विभाग, क्रमांक:अंनियो १००९/प्र.क्र.३२/सेवा-४, दिनांक १८/०८/२००९
४) शासन निर्णय वित्त विभाग, क्रमांक:अंनियो १००९/प्र.क्र.१/सेवा-४, दिनांक १२/११/२०१०
५) शा. नि., कृषी व पदुम विभाग, क्रमांक:कृविआ १११०/प्र.क्र.१००/६-ए, दिनांक ०५/०३/२०११
६) शा. नि., कृषी व पदुम विभाग, क्रमांक:संकीर्ण १५१४/प्र.क्र.११७/६-ए, दिनांक ३०/११/२०१५

<u>प्रस्तावना:-</u>

उपरोल्लेखित क्रमांक २ येथील शासन निर्णय, कृषी व पदुम विभाग, दिनांक २७/०२/२००९ अन्वये राज्यातील कृषी विद्यापीठे व त्यांच्याशी संलग्न अनुदानित महाविद्यालयातील अधिकारी/कर्मचारी यांच्यासाठी नवीन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना लागू करण्याबाबत धोरणात्मक निर्णय घेण्यात आलेला आहे. यानुषंगाने, परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेंतर्गत राज्य शासनाकडून कृषी विद्यापीठांना द्यावयाच्या समतुल्य अंशदानासाठी लेखाशिर्ष - मागणी क्रमांक डी-४, २४१५ कृषी विषयक संशोधन व शिक्षण, ०१-पीक संवर्धन, १२०-इतर संस्थांना सहाय्य (योजनेतर), १२०-(००)(०१) महात्मा फुले कृषी विद्यापीठाला सहाय्यक अनुदान (२४१५ ००२५)/ १२०-(००)(०२) डॉ. बाळासाहेब सावंत कोंकण कृषी विद्यापीठाला सहाय्यक अनुदान (२४१५ ००३४)/ १२०-(००)(०३) डॉ. पंजाबराव देशमुख कृषी विद्यापीठाला सहाय्यक अनुदान (२४१५ ००४३)/ १२०-(००)(०४) वसंतराव नाईक मराठवाडा कृषी विद्यापीठाला सहाय्यक अनुदान (२४१५ ००५२) याखाली तरतूद करण्यास मान्यता देण्यात आली होती. तथापि, परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेसाठी शासनाकडून कृषी विद्यापीठांना समतुल्य अंशदानाची रक्कम आहरित करण्यासाठी स्वतंत्र लेखाशिर्ष असणे आवश्यक होते. यानुषंगाने, या योजनेसाठी नवीन लेखाशिर्ष उघडण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय** -

वरील प्रस्तावनेस अनुलक्षून, शासनाने आता असा निर्णय घेतला आहे की, शा. नि. कृषी व पदुम विभाग, क्रमांक:कृविआ १११०/प्र.क्र.१००/६-ए, दिनांक २७/०२/०९, नुसार परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेंतर्गत राज्यशासनाकडून कृषी विद्यापीठांना द्यावयाच्या समतुल्य अंशदानासाठी,

मागणी क्रमांक - डी-४, २४१५-कृषि विषयक संशोधन व शिक्षण, ०१-पीक संवर्धन, १२०-इतर संस्थांना सहाय्य (योजनेतर), १२०(००)(०१) मफुकृवि सहायक अनुदान २४१५ ००२५, १२०(००)(०२) डॉ. बासाकोंकृवि सहायक अनुदान २४१५ ००३४, १२०(००)(०३) डॉ. पंदेकृवि सहायक अनुदान २४१५ ००४३, १२०(००)(०४) वनामकृवि,सहायक अनुदान २४१५ ००५२ खाली करण्यात येत असलेली तरतूद सन २०१७-१८ पासून कृषी विद्यापीठनिहाय खालीलप्रमाणे लेखाशिर्षाखाली करण्याची जबाबदारी नियंत्रक यांची राहील.

**मागणी क्रमांक-डी ३,**
**२४१५ -कृषी विषयक संशोधन व शिक्षण**
**८० - सर्वसाधारण ,**
**१२० - इतर संस्थांना सहाय्य**

**(००) (०१) - डॉ. बाळासाहेब सावंत कोंकण कृषी विद्यापीठाला कर्मचाऱ्यांच्या अंशदानाच्या रक्कमेइतकी समतुल्य अंशदानाची रक्कम देण्यासाठी सहायक अनुदान.**
**(२४१५ १०१२)**

**(००) (०२) - महात्मा फुले कृषी विद्यापीठाला कर्मचाऱ्यांच्या अंशदानाच्या रक्कमेइतकी समतुल्य अंशदानाची रक्कम देण्यासाठी सहायक अनुदान.**
**(२४१५ १०२१)**

**(००) (०४) - वसंतराव नाईक मराठवाडा कृषी विद्यापीठाला कर्मचाऱ्यांच्या अंशदानाच्या रक्कमेइतकी समतुल्य अंशदानाची रक्कम देण्यासाठी सहायक अनुदान.**
**(२४१५ १०४१)**

**(००) (०५) - डॉ.पंजाबराव देशमुख कृषी विद्यापीठाला कर्मचाऱ्यांच्या अंशदानाच्या रक्कमेइतकी समतुल्य अंशदानाची रक्कम देण्यासाठी सहायक अनुदान.**
**(२४१५ १०५९)**

२. कृषी विद्यापीठांनी त्यांचे सन २०१७-१८ पासून पुढील अर्थसंकल्पीय अंदाज व सुधारित अंदाज सादर करताना समतुल्य अंशदानासाठी आवश्यक असणाऱ्या अनुदानाची मागणी वरीलप्रमाणे लेखाशिर्षाखाली करावी. याबाबतची जबाबदारी कृषी विद्यापिठाच्या नियंत्रकांची राहील.

३. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक ३६९/ अर्थ-१३, दिनांक २७/०७/२०१६ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

४. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१६१२२८१५३२५९४४०१ हा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Kamlakar Yeshvant Vanjare

Digitally signed by Kamlakar Yeshvant Vanjare
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=AGRICULTURE AND ADF DEPT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c08eef62183520696d2005b153b8cc2a552337a23fc4d457a4434216d9324c3b, serialNumber=6fd0ddfb9412fda09432e5f8a3e140c065770ba4ca63ef6fc5ba354810e2828b, cn=Kamlakar Yeshvant Vanjare
Date: 2016.12.28 15:35:45 +05'30'

(क.य. वंजारे)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत-**

१) मा. राज्यपाल तथा कुलपती, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
३) मा.मंत्री, कृषी यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४) मा. राज्यमंत्री, कृषी यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
५) मा.अपर मुख्य सचिव (कृषि) यांचे स्वीय सहायक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई,
६) सचिव, सामान्य प्रशासन विभाग व वित्त विभाग (लेखा व कोषागारे), मुंबई,
७) कुलगुरु, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, जिल्हा-अहमदनगर,
८) कुलगुरु, वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी,
९) कुलगुरु, डॉ. पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला,
१०) कुलगुरु, डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली, जिल्हा-रत्नागिरी,
११) कृषि आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१२) महासंचालक, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, सर्व्हे नं.१३२/ब, भोसलेनगर, पुणे-७,
१३) महालेखापाल, महाराष्ट्र १/२, (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर,
१४) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
१५) उप संचालक, राज्य अभिलेख देखभाल अभिकरण, मुंबई,
१६) मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
१७) सह मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई, पुणे, नाशिक, औरंगाबाद, अमरावती व नागपूर,
१८) जिल्हा लेखा परीक्षा अधिकारी, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई, पुणे, नाशिक, औरंगाबाद, अमरावती, नागपूर,
१९) सल्लागार (वित्त), महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, सर्व्हे नं.१३२/ब, भोसले नगर, पुणे-७,
२०) सह संचालक (प्रशासन), महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, सर्व्हे नं.१३२/ब, भोसले नगर, पुणे-७,
२१) कुलसचिव/नियंत्रक, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, जिल्हा-अहमदनगर,
२२) कुलसचिव/नियंत्रक, वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी,
२३) कुलसचिव/नियंत्रक, डॉ. पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला,

२४) कुलसचिव/नियंत्रक, डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली, जिल्हा-रत्नागिरी,
२५) प्राचार्य, आनंद निकेतन कृषि महाविद्यालय, वरोरा, जि.चंद्रपूर,
२६) प्राचार्य, शिवाजी कृषि महाविद्यालय, अमरावती, जिल्हा-अमरावती,
२७) प्राचार्य, ग्रामीण शिक्षण संस्था, वर्धा,
२८) प्राचार्य, ग्रामीण शिक्षण संस्था, अमरावती,
२९) प्राचार्य, जनता कृषि तंत्र विद्यालय, अमरावती,
३०) प्राचार्य, कृषि तंत्र विद्यालय, मालेगाव कँप, जिल्हा-नाशिक,
३१) संचालक, महात्मा गांधी आदिवासी जनता विद्यालय, कोसबाड हील, जिल्हा ठाणे,
३२) अधिक्षक, कृषि तंत्र विद्यालय,कसबाड हिल, जिल्हा ठाणे,
३३) जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर/दापोली, जि.रत्नागिरी/परभणी/अकोला,
३४) अधिक्षक कृषि अधिकारी, अहमदनगर, रत्नागिरी, परभणी, अकोला,
३५) उप विभागीय कृषि अधिकारी, अहमदनगर, दापोली (जि.रत्नागिरी), परभणी, अकोला,
३६) कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्य व्यवसाय विभागातील सर्व सह सचिव/उप सचिव/ अवर सचिव/कक्ष अधिकारी,
३७) वित्त विभाग (कार्यासन सेवा-४/कोषा-५), मंत्रालय, मुंबई-३२,
३८) निवड नस्ती (कार्यासन-६अे).